वन प्रशिक्षण संस्था, चिखलदरा येथील नुतनीकरणाचे कामांसाठी अवस्था-१ च्या एकूण नऊ अंदाजपत्रकांना प्रशासकीय मान्यता प्रदान करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**महसूल व वन विभाग,**

**शासन निर्णय क्र.वनबां-२०१८/प्र.क्र.४२२/फ-९**

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२

**दिनांक :- ११ डिसेंबर, २०१८**

**वाचा :-** १) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (संशोधन, शिक्षण व प्रशिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र.कक्ष-२/योजना/प्र.क्र.०२(१८-१९)/५५६/२०१८-१९, दिनांक ३१.१०.२०१८

२) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य,नागपूर यांचे पत्र क्र. कक्ष २४/वअं/लेखा/प्रमं./प्र.क्र.५४/६७२/२०१८-१९, दिनांक ०२.११.२०१८.

**प्रस्तावना:-**

मुख्य वनसंरक्षक (शिक्षण व प्रशिक्षण), पुणे यांचेकडील वन प्रशिक्षण संस्था, चिखलदरा येथील नुतनीकरणाच्या कामासाठी अवस्था-१ चे एकूण नऊ अंदाजपत्रके संदर्भ क्र.१ च्या पत्रान्वये अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (संशोधन, शिक्षण व प्रशिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी शिफारशीसह सादर केले आहे. सदरचे अंदाजपत्रके सन २०१७-१८ च्या दरसूचीवर आधारित असून अंदाजपत्रकास वन अभियंता, महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी तांत्रिक मंजूरी प्रदान दिलेली आहे.

संदर्भ क्र.२ अन्वये अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यासाठी प्रस्ताव शासनास सादर केला आहे. त्याअनुषंगाने अंदाजपत्रकाचे छाननीअंती वन प्रशिक्षण संस्था, चिखलदरा येथील नुतनीकरणाच्या कामासाठी अवस्था-१ चे एकूण नऊ अंदाजपत्रके ४ टक्के आकस्मिक खर्च, ५ टक्के सेंटेज चार्जेस व १२ टक्के वस्तु व सेवा कर यासह एकूण रू.१२,९२,८४,०००/- इतक्या रकमेच्या अंदाजपत्रकांना सदर कामाच्या बांधकामाचा खर्च महसूल व वन विभागाच्या उपलब्ध असलेल्या नियतव्ययातून करण्यात यावा, या अटीच्या अधिन राहून सार्वजनिक बांधकाम विभागाने सहमती दिलेली आहे. त्यानुसार सदर एकूण नऊ अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्याबाबतची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी संदर्भ क्र.२ वरील दिनांक ०२.११.२०१८ रोजीच्या पत्रान्वये शासनास सादर केलेला प्रस्ताव विचारात घेता वन प्रशिक्षण संस्था, चिखलदरा येथील नुतनीकरणाच्या कामासाठी अवस्था-१ चे एकूण नऊ अंदाजपत्रके ४ टक्के आकस्मिक खर्च, ५ टक्के सेंटेज चार्जेस व १२ टक्के वस्तु व सेवा कर यासह एकूण रू.१२,९२,८४,०००/- इतक्या रकमेच्या खालील तक्त्यात दर्शविण्यात आलेल्या कामाचे अवस्था-१ चे एकूण नऊ अंदाजपत्रकांना सार्वजनिक बांधकाम विभागाने दिलेल्या सहमतीस व सदर बांधकामाचा खर्च विभागाकडे योजनेंतर्गत उपलब्ध असलेल्या नियतव्ययातून करण्यात यावा, या अटीच्या अधिन राहून शासनाची प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे.:-

| अ. क्र. | कामाचे नाव | अंदाजपत्रकीय रक्कम रुपये |
|---|---|---|
| १ | Construction of Hospital Block at Forest Training Institute Chikhaldara | ३९,६३,९००/- |
| २ | Construction of Faculty House B१ Block at Forest Training Institute Chikhaldara | १,०६,५२,०००/- |
| ३ | Construction of Faculty House B२ Block at Forest Training Institute Chikhaldara | १,०६,५२,०००/- |
| ४ | Construction of Type III Quarter Block at Forest Training Institute Chikhaldara | ७७,०८,६००/- |
| ५ | Construction of Rain Water Harvesting at Forest Training Institute Chikhaldara | १,३२,६१,६००/- |
| ६ | Construction of Water Tank at Forest Training Institute Chikhaldara | २८,२३,६००/- |
| ७ | Construction of १० Rooms Near Existing Hostel Block at Forest Training Institute Chikhaldara | ३,५७,१६,३००/- |
| ८ | Construction of Class Room Block at Forest Training Institute Chikhaldara | १,०५,६५,५००/- |
| ९ | Construction of Wall Compound at Forest Training Institute Chikhaldara | ३,३९,४०,५००/- |
| | **एकूण रुपये :-** | **१२,९२,८४,०००/-** |

सदर प्रशासकीय मान्यतेच्या अनुषंगाने खालील विहीत केलेल्या अटी व शर्तींचे पालन करणे संबंधितावर बंधनकारक राहील.

१. सदर बांधकामाच्या अनुषंगाने सार्वजनिक बांधकाम विभागाचा शासन निर्णय क्र.बीडीजी-२०१४/प्र.क्र. ९६/इमा-३, दिनांक ८.७.२०१४ मधील कार्यपध्दतीनुसार कार्यवाही करण्यात यावी.
२. काम सुरु करण्यापूर्वी जागेच्या मालकी हक्काबाबतची पूर्तता करुन घ्यावी.
३. प्रत्यक्ष काम करते वेळी पर्यावरण विभाग, शासन निर्णय क्र.इएनव्ही/२०१३/ प्र.क्र.१७७/ तां.क.१, दिनांक १० जानेवारी २०१४ मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वांनुसार कार्यवाही करण्यात यावी.
४. ढोबळ स्वरूपात धरण्यात आलेल्या तरतुदीबाबत काम करतेवेळी विस्तृत अंदाजपत्रक दरपत्रके मंजूर करूनच काम हाती घ्यावे.
५. सदर कामाच्या बांधकामाचा खर्च योजनेंतर्गत मंजूर उपलब्ध असलेल्या नियतव्ययातून करण्यात यावा.
६. सदरहू कामे करतांना वन (संवर्धन) अधिनियम १९८० अंतर्गत तरतूद तसेच प्रचलित कायदे / नियम संदर्भाधिन तरतूदींचा भंग होणार नाही. तसेच कोणतीही अनियमितता होणार नाही याची दक्षता घ्यावी.

सदर आदेश शासन निर्णय वित्त विभाग, क्र. विअप्र १०.०८/प्र.क्र.७०/२००८/ विनियम, दिनांक १५ मे, २००९, वित्तीय अधिनियम नियम पुस्तिका, १९७८, भाग पहिला, उप विभाग-पाच नुसार महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिका अंतर्गत प्रदान करण्यात आलेले वित्तीय अधिकार, अ.क्र. १, परिच्छेद क्र. १३४ नुसार विभागास असलेल्या वित्तीय अधिकारानुसार व सार्वजनिक बांधकाम विभाग यांच्या सहमतीने, निर्गमित करण्या येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८१२१४१५५०५५२०१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

Sujay Dodal

Digitally signed by Sujay Dodal
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue and Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=353112ee0fa47f9ff9bedae88f651d09fdb142df5fbce9c004f7eea06d8b9baf, cn=Sujay Dodal
Date: 2018.12.14 15:57:46 +05'30'

**( सुजय दोडल )**
**सह सचिव (वने)**
**महसूल व वन विभाग**

**प्रति,**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर
२. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर
३. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (संशोधन, शिक्षण व प्रशिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे
४. मुख्य वनसंरक्षक (शिक्षण व प्रशिक्षण), पुणे
५. महालेखापाल-१/२ (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर.
६. सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
७. वित्त विभाग, व्यय-१० कार्यासन, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
८. नियोजन विभाग (का-१४७५), मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
९. फ-२/ब-१ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
१०. कार्यासन फ-९, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.(निवडनस्ती)